**महाराष्ट्र राज्यात मेंढी चराईसाठी उपलब्ध असलेले व नसलेले वनविभागाचे क्षेत्राबाबत अभ्यास करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एमएफपी-२१०३/प्र.क्र.१३५/फ-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २ सप्टेंबर, २०१५.

**प्रस्तावना :-**

अमरावती व धुळे येथील वन अधिका-यांनी वनक्षेत्रात मेंढी चराई प्रकरणांमध्ये केलेल्या कारवाईच्या पार्श्वभूमीवर मा. मंत्री (वित्त आणि नियोजन, वने) यांचे अध्यक्षतेखाली दिनांक २६.०८.२०१५ रोजी मुंबई येथे एक बैठक घेण्यात आली. सदर बैठकीस काही वरिष्ठ आमदार, स्थानिक लोक प्रतिनिधी, धनगर समाजाचे प्रतिनिधी तसेच मुख्य वनसंरक्षक अमरावती व धुळे उपस्थित होते. सदर बैठकीमध्ये महाराष्ट्र राज्यातील वनक्षेत्रातील गुरे चराई नियमावली, मेंढी चराई जमाबंदी अहवाल, मेंढी चराईसाठी उपलब्ध असलेले वन क्षेत्र, सदर वन क्षेत्रात पावसाळ्यातही मेंढी चराईसाठी परवानगी मिळणे, तसेच मेंढी चराईसाठी वनक्षेत्र उपलब्ध नसलेल्या वन विभागात क्षेत्र उपलब्ध करुन देणे याबाबत सविस्तर चर्चा करण्यात आली. चर्चेअंती मा. मंत्री (वित्त आणि नियोजन, वने) यांनी वन क्षेत्रात मेंढी चराई साठी वन क्षेत्र उपलब्ध करून देण्यासंदर्भात प्रश्नाचा अभ्यास करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत निर्देश दिले आहेत.

**शासन निर्णय :-**

१. मा. मंत्री (वित्त आणि नियोजन, वने) यांनी यांनी दिलेल्या निर्देशानुसार खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), म.रा. नागपूर | अध्यक्ष |
| २. | श्री. गणपतराव देशमुख, विधानसभा सदस्य | सदस्य |
| ३. | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( संसाधन उपयोग), म.रा. नागपूर | सदस्य |
| ४. | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), अमरावती | सदस्य सचिव |
| ५. | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), धुळे | सदस्य |
| ६. | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नाशिक | सदस्य |
| ७. | श्री. लहू शेवाळे, औरंगाबाद | सदस्य |
| ८. | डॉ. विकास महात्मे, महात्मे आय बॅक आय हॉस्पिटल, नागपूर | सदस्य |

२. उक्त समितीची कार्यकक्षा पुढील प्रमाणे राहील.

१. महाराष्ट्र राज्यातील वनक्षेत्रातील गुरे चराई नियमावली तसेच मेंढी चराई जमाबंदी अहवालाचे पुनर्निरीक्षण करणे.

२. महाराष्ट्र राज्यालगतच्या राज्यातील उदा- कर्नाटक, मध्य प्रदेश, छत्तीसगढ, तेलंगणा इ. राज्यात मेंढी चराईबाबत धोरण, नियम, तरतूदींचा अभ्यास करणे.

३. महाराष्ट्र राज्यात जून ते सप्टेंबर या कालावधीत चराईसाठी वन क्षेत्रावर अवलंबून असणाऱ्या मेंढयांची जिल्हानिहाय संख्या तसेच उपलब्ध वनक्षेत्राची चराई क्षमतेचा विचार करून उक्त कालावधीत मेंढीचराईसाठी वन क्षेत्र उपलब्ध करता येईल किंवा कसे, याबाबत अभ्यास करणे.

४. वनक्षेत्राबाहेर उपलब्ध पडीक जमिनीवर मेंढी चराईसाठी पोषक स्थिती तयार करण्याबाबत अभ्यास करणे.

३. उक्त समितीने आपला अहवाल दिनांक १०.१०.२०१५ पूर्वी शासनास सादर करून त्याची एक प्रत प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना उपलब्ध करावी.

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी उक्त अहवालावर तांत्रिक अभिप्राय दिनांक २०.१०.२०१५ पूर्वी शासनास सादर करावे.

५. सदर समितीला मेंढी चराई संदर्भात कोणतेही शासकीय प्राधिकारी किंवा अशासकीय संस्थेकडून अनुषंगिक माहिती किंवा आकडेवारी मागवून घेण्याचा अधिकार राहील. समितीकडून अशा स्वरूपाची मागणी प्राप्त झाल्यावर संबंधित प्राधिकारी किंवा अशासकीय संस्थेस अशी माहिती देणे बंधनकारक राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०२१७५९४९९२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.09.02 18:04:19 +05'30'

**(वीरेन्द्र तिवारी)**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय),
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक( संसाधन उपयोग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), अमरावती
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), धुळे

५) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नाशिक
६) श्री. गणपतराव देशमुख, विधानसभा सदस्य
७) श्री. प्रकाश शेंडगे, माजी विधानसभा सदस्य
८) डॉ. विकास महात्मे, महात्मे आय बँक आय हॉस्पिटल, नागपूर

प्रतिलिपी - माहिती व आवश्यक कार्यवाहीस्तव

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव), (सर्व)
४) मुख्य वनसंरक्षक व क्षेत्र संचालक, (सर्व)
५) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव), (सर्व)
६) विभागीय आयुक्त (सर्व)
७) वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव) (सर्व)
८) जिल्हाधिकारी, (सर्व).
९) उप वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव) (सर्व)
१०) विभागीय वन अधिकारी /उप विभागीय वन अधिकारी ,(सर्व),
*११) चराई जमाबंदी अधिकारी, (सर्व)*
१२) फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई /निवड नस्ती.